# बिलीचा सुपर केक

मराठी अनुवाद : नीलांबरी





# मोठं आश्चर्य

“बिली जरा आपल्या खोलीची अवस्था पहा..!
आज मी नवीन झाडू घेऊन
तुझी खोली साफ करते.
सगळी घाण उचलून टाकते.“



“आई इथे कुठे कचरा आहे ?
या मला लागणार्‍या वस्तू आहे.
मला कचरा कुठेच दिसत नाही.
आई, तू तुझा झाडू घेऊन जा बरं..”

“काय म्हणतोस? इथे तर मला सगळा कचराच दिसतोय.
मी हा साफ करुन टाकणारच आहे.”





““नको आई.. कृपा करुन हे सगळं इथेच राहू दे.
मला हे सगळं लागणार आहे. हे सगळं माझं आहे.
मी काही वस्तू तयार करतोय. त्यासाठी मला हे सगळं लागतंय.
आई, इथलं सामान नका उचलू.
तुम्हाला दिसतंय ते सगळं माझ्या उपयोगाचं आहे.”



“हे काय आहे?
आणि ते काय आहे?
हे सगळं कचर््यात टाकायला हवंय.”





“आई.. नको.. नको..
मला या वस्तूंची खूप गरज आहे.
मला यापासून नवीन गोष्टी तयार करायच्या आहेत.
पण मी काय तयार करणार आहे
ते मला आत्तापासून तुला सांगायचं नाहीये..
तू इथून जा बरं.. मला माझं काम करु दे..
आणि आपला झाडू पण घेऊन जा.
माझ्या खोलीची साफसफाई करायचे कष्ट कृपा करुन
घेऊ नकोस.”



"अरे हे काय आहे?
आणि ते काय आहे?
मला हे सगळं कचऱ्यात टाकावंच लागेल."



"नको गं आई.. हे टाकू नकोस.
मला नवीन गोष्टी तयार करायला
या सगळ्याची गरज आहे."

“बरं.. ठीक आहे.. ठीक आहे.
पण हा कचरा माझ्या नजरेसमोर नको.
अरेच्चा, या कचर््यातली ही गोष्ट तर मी फेकू
शकते.”





“नको आई.. कृपा करुन ते फेकू नकोस.
ही गोष्ट मला लागणार आहे. ती परत दे बरं..
मी जे काही तयार करतोय त्यासाठी मला या
सगळ्या वस्तू लागणार आहेत.
इथून तू काहीही नेऊ नकोस.
या सगळ्या गोष्टी माझ्या आहेत.
आणि माझ्या कोणत्याच गोष्टी इथून नेऊ नकोस.”



“अरे हे बघ.. कमीत कमी हे तर टाकून देता येईल ना?
नाही गं आई. ही वस्तू तर खूपच कामाची आहे.
ही अजिबात टाकू नकोस.”

“बिली. तू वेड्यासारखं बोलतोयस.
तू परत परत हे टाकू नकोस, ते टाकू नकोस
इतकंच म्हणतोयस.
पण जो कचरा आहे तो तर टाकून द्यावाच
लागेल.”





“आई.. माझ्यावर कृपा कर आणि मला हवं ते करु दे..
इथे जे काही दिसतंय ना ते सगळं मला लागणारं आहे.
तुझा झाडू इथून घेऊन जा
आणि माझ्या खोलीला हात लावू नकोस.”



“जाऊ दे.. मी ही फालतू गोष्ट घेऊन जाते.
बाकीच्या गोष्टी तुझ्यासाठी ठेवते.”





आई, तुझ्या अजिबात लक्षात येत नाहीये..
मी एक वेगळीच गोष्ट तयार करतो आहे.
त्यासाठी मला या सगळ्या गोष्टी लागणार आहेत.
नाही तर माझं अनोखं प्रोजेक्ट अपूर्ण राहील.”





"बरं.. तू काय तयार करतोयस ते सांग बरं..
या कचर्‍याचं तू काय लोणचं घालणार आहेस?"

"नाही मी याचं लोणचं नाही घालणार.
मी तुझ्यासाठी काहीतरी नवीन बनवतोय."

"मी काय बनवतोय.. ते मी आत्ता सांगू शकत नाही.
माझा प्रोजेक्ट मी सांगू शकत नाही.
कृपा करुन तू जा.. लगेचच जा..
आणि मी म्हणेन तेव्हाच परत ये.
तेव्हा तू पहाशील आणि तुला सगळं समजेल.
प्रोजेक्ट पाहून तुला बरं वाटेल."

“आता ये गं आई..”





“बिली, आता दया कर आणि सांग
तुला काय बनवायचंय?”




“आई.. जरा समजून घ्यायचा प्रयत्न कर.
मला तुझ्यासाठी एक महान भेटवस्तू तयार करायची आहे.
मी हे पुस्तक वाचून तुझ्या वाढदिवसाच्या दिवशी
जगातला सर्वात सुपर-केक तयार करणार आहे.”
“काय? केक? तू आजतागायत एकही केक बनवलेला
नाहीस.
तुला केक तयार करता येत नाही. हा वेडेपणा बंद कर.”

“आई, माझ्यावर दया कर आणि मला सुपर केक बनवू दे..
या पुस्तकात केक बनवण्याची कृती दिली आहे.
आई, आता तू जा बरं.. मला माझं काम करु दे
मी चांगला केक तयार करतो. काळजी करु नकोस.”






“अच्छा, तीन अंडी का? मी मोठा केक बनवायचाय म्हणून वीस अंडी वापरतो.”





“आता केकमध्ये मी थोडं हे टाकतो
थोडं ते टाकतो”




“नाही.. नाही..
त्यात मी मांजर घालत नाहीये.“




"पुस्तकात दूध मिसळा असं लिहिलंय
मी खूप दूध घालेन.
आईला चहा आवडतो
त्यामुळे मी त्यात किटलीभर चहा
ओततो..

त्यामुळे मी त्यात किटलीभर चहा
ओततो..
आईला जे काही आवडतं
ते सगळं मी सुपर केकमध्ये घालणार
आहे.
आईला गोड खूप आवडतं..
त्यामुळे मी डबाभर साखर घालतो."





“आईला जाम आवडतो
त्यामुळे मी थोडा जाम पण घालतो.



आईला हॅम आवडतं
मग मी हॅमचा तुकडा पण घालतो.”

“बेकिंग सोडा तर हवाच..
तो मी डबाभर घालतो.







माऊ, तू जरा दूर थांब बरं..
या तरसाळ्यात उडी मारु नको..
आईला, तू आवडतेस हे खरंय
पण वाढदिवसाच्या केकमध्ये नाही.”




“या रेसिपीच्या पुस्तकात इतकंच
लिहिलंय...
पण मी आता केकमध्ये आईला
आवडणार््या सगळ्या गोष्टी घालतो..




आईला पिकल्स आवडतात..
पॉपकॉर्न पण आवडतात..
अरे हे काय आहे
डिंक.. नाही नाही..”



“आता थोडे मासे
आणि परत थोडं हॅम..



ही झाली जेली
लाल आणि पिवळी..”



“हे आहे मस्टर्ड
हे आहे कस्टर्ड
हे सगळं आईचं लाडकं आहे..

अखेरीस मला काय म्हणायचंय ते आईला कळेल
माझ्या स्वप्नातल्या प्रोजेक्टचं मर्म कळेल..”




कुक-बुक



"पुस्तकात लिहिलंय
हे मिश्रण फेटून घ्या
आता सांगा
हे कसं ढवळू

झाडूच्या मागच्या दांड्यानं तरसाळ्यातलं मिश्रण
ढवळतो.
आई आता खोलीत येणार नाही
जोपर्यंत मी तिला बोलावत नाही."





“अच्छा, सांग बरं बिली, तू काय बनवलंस?”
“थांब गं आई, माझं अजून बनवून व्हायचं आहे.
आई, बाहेर जाऊन जरा वेळ थांब बरं..
मी खूण केल्याशिवात आत येऊ नकोस बरं..
जेव्हा तू पहाशील आणि समजून घेशील
तेव्हा माझ्या या भव्य प्रोजेक्टला शाबासकी देशील..”



“आता मला वाटतंय केकला बाहेर काढावं
तो शिजलाय का पहायला थोडं चाखून पहावं..”

“केक दिसतोय तर खूपच छान..
आईलाही केक खाताना मजा वाटेल
रुचकर झालाय असं तिच्या लक्षात येईल..”






“असं केल्यामुळे सगळ्यांना वाटेल
हा केक साधा नाही, वाढदिवसाचा आहे..
एकदम भारी आणि रुचकर केक आहे..”



“अच्छा बिली, आता तरी सांग, तू काय बनवतोयस?
कोणत्या प्रकारचा केक तयार करतोयस?”





“अगं अजून थांब.. थोडं काम व्हायचं आहे
केक अजून झालेला नाही
कृपा करुन इथून जा.. पटकन जा बरं..
मी बोलावल्याशिवाय येऊ नकोस बरं..
जेव्हा तू पहाशील आणि समजून घेशील
तेव्हा माझ्या या सुपर-केकला शाबासकी
देशील..”

“ठीक आहे.. आई, आत जा..”









“बिली, तू किती छान केक बनवलायस
तो पाहूनच माझा जीव भरुन पावलाय
खरंच, मी किती भाग्यवान आहे..

मी आयुष्यभर हा केक जपून ठेवेन..
मग तुला परत दुसरा केक बनवायला लागणार नाही..”

